**विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरू करणे.**

सन २०१५-१६ करिता अनुदानाचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**

**अल्पसंख्याक विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः : तंत्रनि-२०१५/प्र.क्र. ६७ /का.८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

तारीख : ०६ जून, २०१५.

वाचा -

**१) शासन निर्णय क्रमांकःउच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्रमांक:टिईडी-२०१० /(३३४/२००९)/तांशि-५, दि. १३/९/२०११.**

**२) शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. :टिईडी-२०११/(३४७/२०११)/तांशि-५, दि. १९/७/२०१२.**

**३) शासन निर्णय क्रमांकः उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. :मान्यता-२०१४/प्र.क्र.७०/तांशि-५, दि. ८ जुलै, २०१४**

**४) शासन परिपत्रक क्रमांक : अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक, बियुडी-२०१४/प्र.क्र.१४८(भाग-२)/का.७, दि.२१.४.२०१५.**

**५) शासन परिपत्रक क्रमांक : वित्त विभाग क्रमांक, अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७.४.२०१५.**

प्रस्तावना :-

संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णय अन्वये सन २०११-१२ पासून ठाणे, सोलापूर, जळगाव, नांदेड, यवतमाळ, मुंबई शहर व मुंबई उपनगर या ७, संदर्भ क्रमांक २ येथील शासन निर्णय अन्वये सन २०१२-१३ पासून रत्नागिरी, कराड, ब्रम्हपुरी, जालना, अंबड या ५ व संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णय अन्वये सन २०१४-१५ पासून पुणे, लातूर, हिंगोली या ३ अशा एकूण १५ ठिकाणच्या शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी दुसरी पाळी सुरू करण्यात आली आहे. संदर्भ क्रमांक ४ येथील परिपत्रकानुसार सन २०१५-१६ च्या खर्चाकरिता निधी वितरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनामध्ये अल्पसंख्यांक विद्यार्थ्यांसाठी सुरू करण्यात आलेल्या दुस-या पाळीचा खर्च भागविण्यासाठी " मागणी क्रमांक झेड ई-१, २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना, (०१) (३०) अल्पसंख्याक विद्यार्थ्यांसाठी विद्यमान शासकीय तंत्रनिकेतनांमध्ये दुसरी पाळी सुरू करणे, (२२३५ बी ०२२)" या लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ या वर्षाकरिता रु.८,४०,००,०००/- ( रुपये आठ कोटी चाळीस लाख फक्त ) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. आता रु.५,७०,८५,०००/- (अक्षरी रुपये पाच कोटी सत्तर लाख पंच्याऐंशी हजार फक्त) इतकी तरतूद खालीलप्रमाणे वितरीत करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

(रुपये हजारात)

| अ.क्र. | तपशिलवार लेखाशिर्ष (२२३५ बी ०२२) | सन २०१५-१६ साठी अर्थसंकल्पीय अंदाज पुस्तिकेत दर्शविण्यात आलेले अनुदान | वितरीत करावयाचे अनुदान |
|---|---|---|---|
| १ | ०१ वेतन | ४९७०० | ३४७९० |
| २ | २१ पुरवठा व सामग्री | ५८८ | ४१२ |
| ३ | २८ व्यावसायिक सेवा | ३१२६२ | २१८८३ |
| ४ | यंत्रसामग्री व साधनसामग्री | २४५० | ० |
| **एकूण** | | **८४०००** | **५७०८५** |

२. सदर तरतूद संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते नियंत्रक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

३. या योजनेअतंर्गत अल्पसंख्याक समाजातील विदयार्थ्याना प्रवेश देण्यात येऊन त्याचा तपशील वेळोवेळी अल्पसंख्याक विकास विभागास सादर करावा. तसेच सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे व खर्च मंजूर केलेल्या निधीच्या मर्यादेत ठेवण्यात यावा तसेच केलेल्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र (Utilization Certificate) संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी विहित मुदतीत शासनास आणि महालेखापाल कार्यालयास सादर करावे.

४. सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय मुंबई यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/कार्यालयीन आदेश/वित्तीय नियमावली/ सार्वजनिक

बांधकाम विभागाची कार्यनियमावली/भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे निरिक्षण अहवाल/वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०२१३१६१६५३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul C Attar
Digitally signed by Ainul C Attar
DN: CN = Ainul C Attar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Joint Secretary
Date: 2015.06.06 17:21:53 +05'30'

**( अैनुल अत्तार )**
सहसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
२) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई ,
५) प्राचार्य, शासकीय तंत्रनिकेतने, ठाणे, सोलापूर, जळगाव, नांदेड, यवतमाळ, मुंबई शहर,
६) मुंबई उपनगर, रत्नागिरी, जालना, अंबड, ब्रम्हपूरी, कराड, पुणे, हिंगोली व लातूर. (संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचेमार्फत)
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
९) नियोजन विभाग का. १४७५,
१०) वित्त विभाग, व्यय-४/ अर्थ-३ व १४,
११) अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, कृपया सदर निधी B.D.S. वर तात्काळ उपलब्ध करुन द्यावा.
१२) निवडनस्ती.